सार्वजनिक बांधकाम विभागाकडील अवर्गीकृत म्हसवड, माळशिरस, टेभुर्णी, कुर्डुवाडी, बार्शी, लातूर रा. मा. १४५ साखळी क्रमांक - कि.मी. १२५/४५० ते १३१/२१० एकूण लांबी ५.७६ कि.मी. इतकी लांबी बार्शी नगर परिषदेस हस्तांतरित करणेबाबत.

महाराष्ट्र शासन

सार्वजनिक बांधकाम विभाग

शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०२१/प्र.क्र.६१/नियोजन-२

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक-२७ सप्टेंबर, २०२१.

<u>पहावे</u> :- १) शासन निर्णय क्रमांक- संकिर्ण-२००९/प्र.क्र.७२/नियोजन-२, दिनांक ०१ मार्च, २०१३.

<u>प्रस्तावना</u> :-

नगर परिषद, बार्शी यांच्या दिनांक १८/०३/२०१७ रोजीच्या ठराव क्र. २०६ अन्वये सार्वजनिक बांधकाम विभागाकडील अवर्गीकृत केलेला म्हसवड, माळशिरस, टेभुर्णी, कुर्डुवाडी, बार्शी, लातूर रा. मा. १४५ साखळी क्रमांक - कि.मी. १२५/४५० ते १३१/२१० एकूण लांबी ५.७६ कि.मी. लांबीचा रस्ता बार्शी, नगर परिषदेस हस्तांतरित करणेबाबत विनंती केली आहे. त्यानुषंगाने सदर रस्ता नगर परिषद, बार्शी यांचेकडे हस्तांतरित करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

<u>शासन निर्णय :-</u>

सदर रस्ता हा राज्य मार्ग क्र.१४५ दर्जाचा असून, हस्तांतरित करण्याची एकूण लांबी ५.७६ मी. आहे. कुर्डुवाडी, बार्शी, लातूर रस्ता हा बार्शी शहरातील प्रमुख रस्ता असून सदर रस्त्यांच्या लगत शाळा, महाविद्यालये तसेच हॉस्पिटल व बाजारपेठा आहेत. सदर रस्त्यावर मोठया प्रमाणत वाहतुकीची कोंडी असते. यामुळे सदर रस्त्यांचे रुंदीकरण करणे अनिवार्य आहे. तसेच रस्त्या लगत ड्रेनेज लाईन, टेलिफोन लाईन, पाण्याची पाईप लाईन व रस्ता सुशोभिकरण इ. बाबी नगरपरिषदेच्या तरतुदीनुसार करण्यासाठी सदर रस्ता बार्शी नगर परिषदेस हस्तांतरीत करण्यात येत आहे.

त्यानुषंगाने खालील अटींच्या अधीन राहुन सार्वजनिक बांधकाम विभागाकडील सद्य:स्थितीतल अवर्गीकृत ५.७६ कि.मी. लांबीचा रस्ता बार्शी नगर परिषदेस हस्तांतरित करण्यात येत आहे.

१) सदर रस्ता हस्तांतरित केल्यानंतर देखभाल व दुरूस्तीचा खर्च बार्शी, नगर परिषदेच्या निधीतून करण्यात येईल. सदर रस्त्याच्या देखभाल-दुरूस्ती करिता शासनाकडून कोणतेही अतिरिक्त अनुदान देता येणार नाही.

२) सदर रस्त्यावरील अतिक्रमणे हटवण्याची जबाबदारी बार्शी, नगर परिषदेची राहील.

३) सदर रस्त्याबाबतचे सर्व न्यायलयीन प्रकरणे हाताळण्याची जबाबदारी बार्शी, नगर परिषदेची राहील.

४) भविष्यात आवश्यकतेनुसार सदर रस्ता पुन्हा सा.बां.विभागाच्या ताब्यात दयावयाचा निर्णय झाल्यास सदर रस्ता सुस्थितीत सा.बां.विभागाच्या ताब्यात देण्याची जबाबदारी बार्शी, नगर परिषदेची राहील व याबाबत कोणत्याही प्रकारच्या रस्त्यावर कामे केल्याबाबतच्या निधीची मागणी/ दावे/ खर्चाची मागणी इत्यादी मान्य होणार नाही.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११००४१५५६०२७४१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GANPAT SANDIPAN KACHARE

Digitally signed by GANPAT SANDIPAN KACHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3021bf955fefd71ffad5dd7c97769147f19aca6383a12fed6cff4849d78e224a, pseudonym=44879507A55BADCE1C62B2D52FC25354CE085DFF, serialNumber=B5B30AEBA818C77E43E7B8BA4BCA0E9F0D137FEAB0BBCB16CACF2D44087E8A76, cn=GANPAT SANDIPAN KACHARE
Date: 2021.10.04 15:58:24 +05'30'

**( ग. सं. कचरे )**

अवर सचिव ,महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, पुणे.
२) प्रधान सचिव (नवि-१) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) मुख्य अभियंता सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
४) अधिक्षक अभियंता,मुंबई बांधकाम मंडळ, सोलापूर. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करण्यात यावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
५) जिल्हाधिकारी, सोलापूर.
६) मुख्याधिकारी, नगरपरिषद, बार्शी.
७) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.-२ बार्शी.
८) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
९) रेखाचित्र शाखा, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.
११) निवडनस्ती.